मंत्रालयीन अधिकाऱ्यांच्या निवासस्थानी कार्यालयीन कामाचे कागदपत्र घेऊन जाण्यासाठी चतुर्थश्रेणी कर्मचाऱ्यांच्या सेवेचा लाभ घेण्याबाबत.
प्रवास खर्च व मेहनतानाच्या पोटीच्या रकमेच्या दरात सुधारणा.

महाराष्ट्र शासन
वित्त विभाग
शासन निर्णय क्रमांक : मआख-१०००/प्र.क्र.८१/२०००/विनियम
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२,दिनांक:- ५ फेब्रुवारी, २००१.

वाचावे :१) शासन निर्णय,वित्त विभाग,क्रमांक : एमसीई-१०७६/२११९/जीईएन-५, दिनांक १९ फेब्रुवारी, १९७७.
२) शासन निर्णय,वित्त विभाग,क्रमांक : मआख-१४८७/(२४०)/कोषा -६, दिनांक २७ नोव्हेंबर, १९८७

## शासन निर्णय

शासन निर्णय,वित्त विभाग, क्रमांक : मआख-१४९२/प्र.क्र.१०६/विनियम, दिनांक १४ ऑक्टोबर, १९९३ नुसार मंत्रालयीन अधिकाऱ्यांच्या निवासस्थानी कार्यालयीन कामाचे कागदपत्र घेऊन जाणाऱ्या चतुर्थश्रेणी कर्मचाऱ्यांना प्रवास खर्च व मेहनतान्यापोटी रक्कम अदा करण्याचे दर निश्चित करण्यात आले आहेत. सदर दरांमध्ये सुधारणा करण्याचा प्रश्न शासनाच्या विचाराधीन होता. आता ते सुधारीत दर खालीलप्रमाणे निश्चित करण्यात येत आहेत. :-

| अनुक्रमांक | प्रवासाचा तपशील | एका पूर्ण भरलेल्या बॅगेसाठीचा दर रू. पैसे. |
|---|---|---|
| १ | मंत्रालय ते चर्चगेट रेल्वे स्टेशन | ५.०० |
| २ | मंत्रालय ते व्ही. टी. रेल्वे स्टेशन | ६.०० |
| ३ | चर्चगेट रेल्वे स्टेशन पेक्षा कमी अंतराकरीता | ४.०० |
| ४ | व्ही. टी. रेल्वे स्टेशनपेक्षा कमी अंतराकरीता | ५.०० |
| ५ | बांद्रे रेल्वे स्टेशन ते बांद्रे शासकीय वसाहत | ८.०० |
| ६ | महालक्ष्मी रेल्वे स्टेशन ते हाजीअली शासकीय वसाहत. | ७.०० |

२. शासकीय वसाहत बांद्रे आणि शासकीय वसाहत हाजीअली व्यतिरिक्त अन्य ठिकाणी रेल्वे स्टेशन ते शासकीय अधिकाऱ्यांचे निवासस्थान ह्या अंतरासाठी हा दर प्रति किलोमीटर रू. ६/- प्रमाणे राहील. हे अंतर १/२ किलो मीटर पेक्षा कमी असल्यास रू. ४/- प्रमाणे व १/२ किलो मीटरपेक्षा जास्त असल्यास पूर्ण किलोमीटर अंतर समजून वरील खर्च पूर्ण किलोमीटर दराने देण्यात यावा.

३. हे सुधारित दर या आदेशांच्या दिनांकापासून लागू होतील.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

अरविंद सिंह
शासनाचे उप सचिव

कृ.मा.प.

प्रति,

१. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-१, महाराष्ट्र, मुंबई ४०० ०२०.
२. महालेखापाल (लेखा परीक्षा)-१, महाराष्ट्र,मुंबई ४०० ०२०.
३. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई./वांद्रे.
४. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई,
५. संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई,
६. राज्यपालांचे सचिव,
७. मुख्यमंत्र्यांचे सचिव,
८. उप मुख्य मंत्र्यांचे सचिव,
९. सर्व मंत्री व राज्यमंत्री यांचे स्वीय सहाय्यक,
१०. मंत्रालयातील सर्व प्रशासकीय विभाग,
११ निवड नस्ती, विनियम, वित्त विभाग.

---